सन २०१८-१९ करिता राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार या योजनेंतर्गत खालील पशु आरोग्य उप योजनेतील ब्रुसेला नियंत्रण कार्यक्रमाकरिता (सर्वसाधारण प्रवर्ग) ₹२.०४५ कोटी निधी वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि ०११८/प्र.क्र.३२/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ डिसेंबर, २०१८

संदर्भ :

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि. २७/०४/२०१७
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८
३. राज्य स्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या (SLSC) २५ व्या बैठकीचे इतिवृत्त- पत्र क्र. आरकेव्ही-०५१८/प्र.क्र.१६२/१४-अे, दि. २७ ऑगस्ट, २०१८, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१८ आरकेव्हीवाय, दि. २८/११/२०१८

प्रस्तावना :

राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येत असून या योजनेंतर्गत पशु आरोग्य उप योजनेकरिता केंद्र शासनाने संदर्भांकित दि.२८/११/२०१८ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्रास सन २०१८-१९ करिता एकूण ₹ ४.२३ कोटी रक्कमेचे वार्षिक नियतवाटप (Allocation) मंजूर केले आहे. या वर्षिक नियतवाटपात **केंद्र हिस्याचे ₹ २.५४ कोटी** (सर्वसाधारण प्रवर्ग) आणि त्या समरुप **राज्य हिस्याचे ₹१.६९ कोटी** (सर्वसाधारण प्रवर्ग) असे **एकूण ₹४.२३ कोटी** निधीचे नियतवाटप मंजूर केलेले आहे. सदर रक्कमेच्या मर्यादेत चालू वर्षी योजनेंतर्गत प्रकल्पांची अंमलबजावणी करावयाची आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.२८/११/२०१८ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत पशु आरोग्य उप योजनेसाठी पहिल्या हप्त्याव्दारे ₹१.२२७ कोटी निधी वितरीत केला आहे, त्यास अनुसरुन राज्य हिस्याचा ₹०.८१८ कोटी निधी वितरण आवश्यक आहे.

अशाप्रकारे, पहिल्या हप्त्यातील केंद्र हिस्याकरिता समरुप राज्य हिस्याचा आवश्यक ₹ ०.८१८ कोटी निधी आणि केंद्र हिस्स्याचा ₹ १.२२७ कोटी निधी असा केंद्र व राज्य हिस्याचा मिळून एकूण ₹२.०४५ कोटी निधी विभागास वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर निधी आयुक्त (पशुसंवर्धन) यांना आयुक्त (कृषि) यांच्या मार्फत वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः**

१. या शासन निर्णयान्वये सन २०१८-१९ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत पशु आरोग्य उपयोजनेंतर्गत ब्रुसेला नियंत्रण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी (सर्वसाधारण प्रवर्ग) केंद्र व राज्याच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या प्रमाणात एकूण ₹२.०४५ कोटी (रुपये दोन कोटी चार लाख पन्नास हजार फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहेत –

**(रक्कम ₹ कोटी)**

| अ.क्र. | योजनेचे नाव | सर्वसाधारण प्रवर्गाकरिता मंजूर निधी (६०:४०) | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १. | राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार - पशु आरोग्य उप योजना | १.२२७ | ०.८१८ | २.०४५ |

२. परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद केल्यानुसार, राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत केंद्र हिस्याचा ₹१.२२७ कोटी (रुपये एक कोटी बावीस लाख सत्तर हजार फक्त), आणि राज्य हिस्स्याचा ₹ ०.८१८ कोटी (रुपये एक्क्याऐंशी लाख फक्त) असा एकूण ₹ २.०४५ कोटी ( रुपये दोन कोटी चार लाख पन्नास हजार फक्त) निधी उपलब्ध करुन दिला असून तो योजनेच्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा –

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **सर्वसाधारण** | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (८००) इतर खर्च<br>(००) (०९) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना)<br>(६० टक्के केंद्र हिस्सा)<br>(२४०१ ८२३५) ३३-अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (८००) इतर खर्च<br>(००) (११) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य (पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना) (४० टक्के राज्य हिस्सा)<br>(२४०१ A२२५) ३३-अर्थसहाय्य |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या ₹ २.०४५ कोटी रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे .

४. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेली ₹ २.०४५ कोटी रक्कम कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे

उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) मध्ये जमा करावी व तसे शासनास अवगत करावे आणि तद्नंतर सदर निधी संबंधित प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी आयुक्त (पशुसंवर्धन) यांना वर्ग करण्यात यावा.

५. उपरोक्त मंजूर निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्यादृष्टीनेच कोषागरातून आहरण करावे आणि विभागाने त्यांना प्राप्त होणाऱ्या निधीचा तात्काळ विनियोग करावा, अंमलबजावणी यंत्रणांनी निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

६. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००७-०८ पासून सन २०१७-१८ पर्यंत विविध विभागांना वितरीत केलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन तसे प्रमाणित केल्यानंतर सदर योजनेंतर्गत उर्वरीत निधी दुसऱ्या टप्प्यामध्ये केंद्र शासनाकडून वितरीत करण्यात येणार आहे, त्यामुळे अंमलबजावणी यंत्रणेने/विभागाने त्यांना सन २००७-०८ ते सन २०१७-१८ या कालावधीत वितरीत केलेल्या निधीचे सनदी लेखापालांकडून लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

७. वैयक्तिक लाभाच्या प्रकल्पांतर्गत सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) अनुदान वितरीत करावे.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२८११४३४९२४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र** :- परिशिष्ट - अ

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.12.28 11:53:25 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (पदुम व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. आयुक्त (पशुसंवर्धन), औंध, पुणे

८. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
९. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१२. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१४. मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती.